श्री. सुहास के. दिवसे भा.प्र.से. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे यांच्या प्रतिनियुक्तीवरील पदाच्या अटी व शर्ती विहीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्रमांकः वखार २०१८/प्र.क्र.८९/१-स
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २३ जानेवारी, २०१९.

वाचा :-

१) सामान्य प्रशासन विभाग शासन आदेश क्र. एईओ- १०१८/प्र.क्र.३३/दहा, दिनांक १३.०७.२०१८
२) महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे जा.क्र.मरावम/आस्थापना/अवव्यसं-प्रतिनियुक्ती/१२८९ दि. २३.७.२०१८

शासन निर्णय:-

श्री. सुहास के. दिवसे, भा.प्र.से. यांची संदर्भ क्र. १ च्या आदेशान्वये अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे या पदावर प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आली आहे. त्या अनुषंगाने शासन असे आदेश देत आहे की, श्री. सुहास के. दिवसे, भा.प्र.से. यांच्या अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक या पदावरील प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती खालीलप्रमाणे विहीत करण्यात येत आहेत :-

१. प्रतिनियुक्तीचा कालावधी :- श्री. सुहास के. दिवसे, भा.प्र.से. हे दि.९/७/२०१८ (मध्यान्हानंतर) ते पुढील आदेश होईपर्यंत या कालावधीत प्रतिनियुक्तीवर असतील मात्र.

अ) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनास आवश्यक वाटली तर त्यांना त्यांच्या प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण होण्यापूर्वी स्वीयेत्तर सेवेतून केव्हाही परत बोलावण्याचा हक्क शासनास असेल.

ब) त्यांच्या सेवेची आवश्यकता महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे या संस्थेस नसेल तर ते त्यांना शासन सेवेत परत पाठवू शकतात. मात्र, ज्या दिनांकापासून तसे करावयाचे असेल त्याच्या कमीत-कमी ३ महिने अगोदर तसे कळविणे आवश्यक राहील.

क) त्यांची अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे या पदावर प्रतिनियुक्तीचा कार्यकाल साधारण: दोन वर्षे इतका राहील.

२. वेतन :- श्री. सुहास के. दिवसे, भा.प्र.से. हे प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे हे पद धारण करतील. दि. ९/७/२०१८ रोजी ते भारतीय प्रशासन सेवेतील वेतन मॅट्रीक्स स्तर क्र.११ मध्ये रु.१,३०,१००/- (कक्ष-२३) इतके वेतन घेतील. तर दि.०१.०१.२०१९ पासून वेतन मॅट्रिक्स स्तर क्र.११ मध्ये

रु.१,३४,०००/ - (कक्ष-२४) इतके वेतन घेतील. त्यांच्या वार्षिक वेतन वाढी मंजूर करण्याबाबतचे आदेश शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाकडून निर्गमित करण्यात येतील.

३. **प्रतिनियुक्ती भत्ता** :- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. भाप्रसे ३०१३/३१२/२०१३/९, दि. ११/०९/२०१३ मधील तरतुदीनुसार प्रतिनियुक्ती भत्ता देण्याबाबत आवश्यक कार्यवाही महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे ही संस्था करेल.

४. **महागाई भत्ता** :- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवा अधिकाऱ्यांना वेळोवेळी ज्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल त्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल.

५. **स्थानिक पूरक भत्ता** :- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांना राज्य शासनाच्या नियमानुसार/ आदेशानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असेल त्या दराने स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय असेल.

६. **निवासस्थान किंवा त्याऐवजी घरभाडे भत्ता** :- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांच्या दर्जास साजेसे निवासस्थान महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे ही संस्था देईल. तथापि, ती संस्था त्यांना योग्य असे निवासस्थान देवू शकत नसेल आणि त्यांच्या ताब्यात प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वी शासकीय निवासस्थान असेल तर ते शासकीय निवासस्थान प्रतिनियुक्तीच्या कालावधीत आपल्या ताब्यात ठेवू शकतात. मात्र, प्रतिनियुक्तीवर गेल्याच्या दिनांकापासून पहिले ३ महिने त्यांना विहित सामान्य दराने व त्यानंतर आर्थिक दराने शासकीय निवासस्थानाचे अनुज्ञेय शुल्क व सेवाशुल्क भरणे आवश्यक आहे. महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे या संस्थेच्या नियमानुसार त्यांना भाडेरहित तत्वावर निवासस्थान देय असेल तर त्याचा लाभ श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांना घेता येणार नाही.

प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत त्यांच्या ताब्यात शासकीय किंवा संस्था यांचे निवासस्थान नसेल तर सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. भा.प्र.से. १५१७/१८०/२०१७/९, दि.११/०८/२०१७ नुसार तसेच त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या बदलानुसार घरभाडे भत्ता अनुज्ञेय असेल.

७. **पदग्रहण अवधी वेतन आणि बदली प्रवास भत्ता**:- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांना त्यांची स्वीयेत्तर सेवेत बदली झाल्यानंतर आणि तेथून परत आल्यानंतर अशा दोन्ही वेळेच्या पदग्रहण अवधीमध्ये, त्यांचे वेतन व प्रवास भत्ता, तो अधिकारी ज्या शासनाच्या सेवेत असताना स्वीयेत्तर सेवेत गेला असेल ते शासन किंवा स्वीयेत्तर सेवेतून परत आल्यानंतर ज्या शासनाच्या सेवेत जाणार असेल ते शासन यांच्या संबंधित नियमानुसार महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे ही संस्था देईल.

८. **प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ, केलेल्या प्रवासाकरिता प्रवास भत्ता** :- श्री. सुहास दिवसे भा.प्र.से. यांना भा.प्र.से. किंवा महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे या संस्थेच्या नियमान्वये यापैकी ज्यांचे नियम अधिक फायदेशीर असतील त्या नियमांनुसार प्रवासभत्ता आणि दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल.

९. **रजा** :- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवा (रजा) नियम १९५५ हे नियम लागू असतील. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना नैमित्तिक रजा व्यतिरिक्त इतर रजा मंजूर करण्यास शासन (सा.प्र.वि./कार्या-१०) सक्षम असेल. स्वीयेत्तर सेवेच्या

कालावधीत अथवा अखेरीस घेतलेल्या रजेच्या कालावधीबद्दल घ्यावयाच्या रजा वेतनाचा व कोणत्याही स्थानिक पूरक भत्त्यावरील संपूर्ण खर्च महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे या संस्थेस सोसावा लागेल.

१०. **विकलांगता रजेबद्दल रजा वेतन** :- स्वीयेत्तर सेवेत किंवा अशा सेवेमुळे आलेल्या विकलांगतेबद्दल मंजूर करण्यांत येणाऱ्या रजेच्या संबंधित, अशी विकलांगता स्वीयेत्तर सेवा संपल्यानंतर उघडकीस आली तरी सुध्दा रजा वेतन देण्यात महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे ही संस्था जबाबदार असेल, अशा रजा वेतनाचा खर्च त्या संस्थेकडून वसूल करण्यात येईल.

११. **रजा वेतन व निवृत्तीवेतन अंशदाने** :- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांच्याबाबत रजा वेतन व निवृत्तीवेतन अंशदान हे सा.प्र.वि. शासन परिपत्रक क्र. भाप्रसे-१४१३/प्र.क्र.२२०/२०१३/९-अ, दि. १२/०२/२०१४ मध्ये नमुद केलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे ही संस्था शासनाकडे (सा.प्र.वि./कार्या.९-अ) प्रत्येक आर्थिक वर्षाच्या समाप्तीपासून १५ दिवसांच्या आत किंवा जर स्वीयेत्तर सेवा आर्थिक वर्ष संपण्यापूर्वी समाप्त झाली असेल तर स्वीयेत्तर सेवा समाप्तीनंतर भरणा करील. या रकमा दोन वेगवेगळ्या डिमांड ड्राफ्टद्वारे (पहिला रजा वेतनाच्या रकमेचा व दुसरा निवृत्तीनंतर अंशदानाच्या रकमेचा) सहायक संचालक (लेखा) सामान्य प्रशासन विभाग (कार्या.९-अ), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. या नावाने काढलेले असणे आवश्यक आहे. सदर रकमा खालील लेखाशिर्षाखाली जमा दर्शविण्यात याव्यात : -

**अ) रजा वेतन :-** ००७० इतर प्रशासकीय सेवा -६० इतर सेवा -८०० इतर जमा रकमा (नऊ) अखिल भारतीय सेवेतील जे अधिकारी स्वीयेत्तर सेवेत प्रतिनियुक्तीवर आहेत त्यांच्याबाबत रजा वेतन अंशदान (००७०० ११६).

**ब) निवृत्ती वेतन अंशदान :-** ००७१- निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ यांच्या वसूली संबंधातील अंशदाने व वसुलीच्या रकमा -०१- नागरी १०१ अभिदाने व अंशदाने (एक) स्वीयेत्तर सेवा अधिकारी (००७१००१२).

**टीप** :- प्रतिनियुक्तीच्या कालावधीतील उपरोक्त रकमांचा भरणा करण्यांस विलंब झाल्यास महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे हे या कालावधीतील दंडात्मक व्याज भरण्यास जबाबदार राहील. तसेच रजा वेतन अंशदान व निवृत्ती वेतन अंशदान वसूल करण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या शासन परिपत्रक क्र. १) भाप्रसे-१००९/प्र.क्र.७०/२००९/९-अ, दि. २६/०२/२०१० व २) भाप्रसे-१४१३/प्र.क्र.२२०/२०१३/९-अ, दि.१२/०२/२०१४ मधील तरतूदी लागू होतील.

१२. **नैमित्तिक रजा** :- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से., यांना प्रतिनयुक्तीच्या कालावधीत राज्य शासनाच्या नियमानुसार नैमित्तिक रजा उपभोगता येईल. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमित्तिक रजा मंजूर करण्यास, संस्थेच्या कार्यकारी प्रमुखास दुय्यम असलेल्या अधिकाऱ्यांना संस्थेचे कार्यकारी प्रमुख व संस्थेच्या कार्यकारी प्रमुखास संबंधित मंत्रालयीन विभाग सक्षम असेल.

१३. **रजा प्रवास सवलत**:- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से., यांना अ.भा.से. (रजा प्रवास सवलत), नियम १९७५ मधील तरतुदीनुसार रजा प्रवास सवलत मिळण्याचा हक्क असेल, याबाबतचा खर्च महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे या संस्थेस सोसावा लागेल. त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमित्तीक रजा वगळता इतर रजा कालावधीतील रजा प्रवास सवलत मंजूर करण्यास शासन

(सा.प्र.वि./का.१०) सक्षम असेल. (शासन परिपत्रक सा.प्र.वि. भाप्रसे - २१०५/७४/२००५/९ दि.०६.१२.२००५)

१४. **वैद्यकीय सवलती** :- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से., यांना अ.भा.से. (वैद्यकीय देखभाल) नियम, १९५४ मधील तरतुदीनुसार वैद्यकीय सुविधांचा लाभ अनुज्ञेय असेल. याबाबतचा खर्च महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे या संस्थेस सोसावा लागेल. मात्र सदर संस्थेचे त्यांच्या कर्मचाऱ्यांसाठी वैद्यकीय सवलत देण्याबाबत वेगळे नियम असतील आणि त्याचा लाभ ते घेऊ इच्छीत असतील तर प्रतिनियुक्ती कालावधीत त्या नियमांचा लाभ घेण्याबाबत विकल्प देण्याचे स्वातंत्र्य त्यांना असेल. (शा.नि.सा.आ.वि. २००५/९/१/आ.३/ दि.१९.०३.२००५ व शा.नि. सा.आ.वि. २०११/३१३/११/राकावि-२ दि.१६.११.२०११)

१५. **भविष्य निर्वाह निधी**:- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से., यांची प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अ.भा.से. (भविष्य निर्वाह निधी) नियम, १९५५ मधील तरतुदीनुसार, भविष्य निर्वाह निधीची वार्षिक वर्गणी दरमहा त्यांच्या वेतनातून भरणे आवश्यक आहे. ही वर्गणी ८००९-राज्य भविष्य निर्वाह निधी - ०१-नागरी-१०४ अखिल भारतीय सेवा भविष्य निर्वाह निधी ८००९-५०३-९ या लेखाशिर्षाखाली जमा दर्शविण्यात यावी. सदर रकमेचा धनादेश त्यांचे भविष्य निर्वाह निधी खाते महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), एक/दोन महाराष्ट्र, मुंबई/नागपूर यापैकी ज्या महालेखापालांकडे असेल त्या महालेखापालांच्या नांवे काढून भविष्य निर्वाह निधी अनुसूचीसह त्यांच्याकडे पाठविण्यात यावा.

प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना त्यांच्या भविष्य निर्वाह निधी खात्यातून परतावा/प्राप्त/ना-परतावा अग्रिम मंजूर करण्यास शासन (सामान्य प्रशासन विभाग) सक्षम असल्यामुळे याबाबतचे अर्ज सामान्य प्रशासन विभाग (कार्या.९), मंत्रालय, मुंबई यांच्याकडे मंजूरीसाठी पाठविण्यात यावेत.

१६. **विभागीय चौकशी** :- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांच्या विरुध्द विभागीय चौकशीबाबत, अखिल भारतीय सेवा (शिस्त व अपील) नियम १९६९ चे नियम लागू असतील. प्रतिनियुक्तीवर असतांना त्यांच्याविरुध्द विभागीय चौकशी करावयाची असेल तर त्यांना शासन सेवेत प्रत्यावर्तीत करण्यात येईल. यासंबंधी कारवाई अंतर्गत त्यांना शासनाने निलंबित केल्यास निलंबनाधीन कालावधीत त्यांना शासन निर्वाह भत्ता देईल. मात्र निर्वाह भत्त्याची रक्कम महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे या संस्थेकडून वसूल करण्यात येईल.

१७. **बोनस किंवा सानुग्रह अनुदान**:- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांना बोनस किंवा सानुग्रह अनुदान अनुज्ञेय नाही. महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे या महामंडळाच्या नियमानुसार जरी त्यांना बोनस अथवा सानुग्रह अनुदान अनुज्ञेय असेल तरी ते त्यांना स्विकारता येणार नाही.

१८. **गट विमा योजना**:- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांच्या वेतनातून दरमहा रु.९६०/- इतकी रक्कम राज्य/केंद्र शासकीय कर्मचारी गट विमा योजनेच्या वर्गणीपोटी महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे ही संस्था दरमहा वसूल करेल आणि ही रक्कम धनादेशाद्वारे महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र, मुंबई यांच्याकडे पाठवेल, ही रक्कम (राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना सदस्यांबाबत)

"८११- इन्शुरन्स ॲण्ड पेन्शन फंड द इन्शुरन्स ॲण्ड फंड स्टेट गर्व्हमेंट एम्प्लॉइज ग्रुप इन्शुरन्स फंड" या लेखाशिर्षाखाली जमा करण्यात यावी. याबाबतची माहिती/तपशिल सहाय्यक संचालक, (लेखा) सामान्य प्रशासन विभाग (कार्या.९-अ), मंत्रालय, मुंबई-३२ यांच्याकडे पाठविणे बंधनकारक आहे.

सदर वर्गणी भरण्यास विलंब करण्यात आल्यास विलंब कालावधीत दंडनिय दराने व्याज आकारण्यात येईल.

१९. **मोटार कार** :- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत वापरासाठी, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे ही संस्था वाहन उपलब्ध करुन देईल. सदर वाहनाचा खाजगी वापर खालील अटींच्या अधिनतेने त्यांना करता येईल.

अ) वाहनाचा खाजगी वापर दरमहा २५० किलोमीटरहून अधिक होता कामा नये. यासाठी त्यांना वेळोवेळी विहीत करण्यात येणाऱ्या दराने भाडे संस्थेस द्यावे लागेल.

ब) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: टीआरए-१०९०/सीआर-३२०/९०/एसईआर-५, दि.१७.१२.१९९० अन्वये निर्गमित केलेल्या आदेशानुसार वाहनाच्या खाजगी वापरास परवानगी असेल. मात्र संबंधित आदेशात वेळोवेळी ज्या सुधारणा केल्या जातील त्या सुधारणाही वाहनाच्या खाजगी वापराबाबत आपोआप लागू असतील.

२०. **कर्ज आणि अग्रिम** :- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत, भविष्य निर्वाह निधी परतावा/प्राप्त/ना-परतावा अग्रिम, घरबांधणी, मोटार कार अग्रिम, वैयक्तिक संगणक अग्रिम मंजूर करण्यास शासन (सा.प्र.वि.) सक्षम असेल, याबाबतचे त्यांचे अर्ज सामान्य प्रशासन विभाग (कार्या.९), मंत्रालय, मुंबई यांच्याकडे मंजूरीसाठी पाठविण्यात यावे. महाराष्ट्र राज्य वखार महामंळ, पुणे संस्थेने त्यांना सदर अग्रिम मंजूर करु नये. महाराष्ट्र शासनाकडून यापूर्वी घरबांधणी, मोटार अग्रिम, संगणक इ. अग्रिम मंजूर केले असेल आणि त्या संदर्भातील मूळ अग्रिम अथवा व्याजाची वसूली असेल तर दर महिन्याच्या वेतनातून तो वसुल करुन त्या रकमा वेगवेगळ्या धनाकर्षाद्वारे महाराष्ट्र कोषागार नियमातील नमुना क्र.५५ मध्ये माहिती भरुन त्या नमुन्यासह पुढील महिन्यात सहाय्यक संचालक (लेखा), सामान्य प्रशासन विभाग (कार्या.९-अ), मंत्रालय, मुंबई यांच्याकडे पाठविणे आवश्यक आहे. धनाकर्ष सहायक संचालक (लेखा), सामान्य प्रशासन विभाग (कार्या.९-अ), या नावाने काढण्यात यावेत.

२१. **प्रतिनियुक्तीवर असताना रजेवरुन अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर नियुक्ती**:- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. हे प्रतिनियुक्तीच्या कालावधीत रजेवर गेले किंवा प्रशिक्षणासाठी गेले आणि त्यांनी धारण करीत असलेल्या पदावर अन्य अधिकाऱ्यांची नियुक्त करण्यात आली आणि ते रजेवरुन अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर त्यांची नियुक्ती अन्य पदावर करण्यात आली तर रजा वेतन, वेतन, पदग्रहण अवधी, सक्तीचा खोळंबा कालावधी इत्यादीबाबत सर्व खर्च, रजा समाप्तीच्या अथवा प्रशिक्षण समाप्तीच्या दिनांकापासून ते अन्य पदाचा कार्यभार धारण करेपर्यंतच्या दिनांकापर्यंत महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे ही संस्था सोषेल.

२२. **निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता**:- महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे या संस्थेत प्रतिनियुक्तीच्या निवासस्थानी शिपाई दिला नसल्यास व श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांना

प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वी निवासी शिपायीऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असल्यास किंवा महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे या संस्थेतील अधिकाऱ्यांना निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असल्यास त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्याच दराने निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असेल, मात्र असा भत्ता घेण्यापूर्वी अधिकाऱ्याने दरमहा निवासी शिपाई देण्यात आलेला नाही, असे प्रमाणपत्र संबंधित अधिकाऱ्यांना देणे आवश्यक राहील.

२३. **शासनाने वेळोवेळी विहित केलेले नियम लागू करणे**:- श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत शासन वेळोवेळी जे नियम करील किंवा कार्यकारी आदेश निर्गमित करील, ते नियम/कार्यकारी आदेश लागू असतील.

२४. **प्रतिनियुक्ती कालावधीत देशात/परदेशात प्रवास**:- महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे या संस्थेमध्ये प्रतिनियुक्तीवर असताना, सदर संस्थेच्या कामासंबंधी देशात कोठेही प्रवास करावयाचा झाल्यास शासनाच्या पूर्व परवानगीची आवश्यकता असणार नाही. मात्र, त्यांच्या दौऱ्याचा कार्यक्रम शासनास कळवावा. संस्थेच्या कामाच्या संबंधात परदेशी जावयाचे असल्यास, शासनाची पूर्वपरवानगी आवश्यक असेल, त्याचप्रमाणे संस्थेशी प्रत्यक्ष संबंध नसलेल्या शासकीय/निमशासकीय कामानिमित्त अथवा खाजगी संस्थांच्या समारंभासाठी देशांतर्गत प्रवास करावयाचा असल्यास त्यासाठी शासनाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक राहील.

२५. **विहित अटी/शर्तीमध्ये समाविष्ट नसलेल्या अटी/शर्तीबाबत**:- वर नमूद केलेल्या अटी/शर्तीमध्ये समाविष्ट नसलेल्या विशिष्ट अटी/शर्तीबाबत महाराष्ट्र शासन संवर्गातील भारतीय प्रशासन सेवा अधिकाऱ्यांना जे नियम, विनियम आणि कार्यकारी आदेश लागू असतील ते नियम, विनियम व कार्यकारी आदेश लागू असतील.

हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौ.सं.क्र.५/२०१९/९, दि.१८/०१/२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१२४१५५७५७९८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jaiprakash Mansaramji Ambade

Digitally signed by Jaiprakash Mansaramji Ambade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperative Marketing, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ce079d77649e3080d74540a4a9ae7f6502ac7e6273891f24ffda6ebea493dce, serialNumber=d214bfebdf948d521ecc91e9cb1487d0cce508098bc2232154c36daba7635819, cn=Jaiprakash Mansaramji Ambade
Date: 2019.01.24 16:07:24 +05'30'

**(ज. म. अंबादे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२. व्यवस्थापकीय संचालक, केंद्रीय वखार महामंडळ, वखार भवन, ४/१, सिटी इन्स्टिट्यूशन एरिया, नवी दिल्ली - ११००१६.
३. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, वखार महामंडळ, पुणे.

४. श्री. सुहास दिवसे, भा.प्र.से., महाराष्ट्र राज्य, वखार महामंडळ, पुणे.
५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. अवर सचिव (कार्यासन-९/९-अ/१०), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९. कक्ष अधिकारी (सा.उ.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (कार्यासन - १ स).